**मुख्य वनसंरक्षक (प्रा.) नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१८/प्र.क्र.३९६/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०९ डिसेंबर, २०२१

वाचा :- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.वनबां-२०१८/प्र.क्र.३९६/फ-९, दिनांक १०.०१.२०१९
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४/वअ/प्रशा-४/२६८/२०२१-२२, दिनांक २०.०९.२०२१.
३) सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे पत्र क्र.बैठक-२०२१/प्र.क्र.८२/इमा-१, दिनांक ०६.१२.२०२१

**प्रस्तावना:-**

मा.मुख्यसचिव यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १५.११.२०१८ रोजी उच्चाधिकार सचिव समितीच्या झालेल्या बैठकीत मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामास रु.२०९९.५१ लक्ष सुधारित अंदाजपत्रकास उच्चाधिकार समितीने सहमती दर्शविली. त्यानुसार शासन निर्णय दिनांक १०.०१.२०२१ अन्वये मान्यता दिली होती.

संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांनी मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामास आर.सी.सी.संकल्पनेतील बदल, जोता पातळीत झालेली वाढ व मूळ किंमतीमध्ये वस्तु व सेवा कर यांचा अभाव, ठेव निधीमुळे सेंटेज चार्जेसमध्ये झालेली वाढ, क्षेत्रफळात झालेल्या वाढीमुळे विंधन विहीर अग्निशमनाकरीता लागणारी आवश्यकता इ.बाबींच्या वाढीव किंमतीमुळे सदर बांधकामाच्या रु.२७.९९ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला.

सदर प्रस्ताव मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दिनांक २९.११.२०२१ रोजी उच्चाधिकार सचिव समिती समोर ठेवण्यात आला. सदर समितीने बैठकीत केलेल्या चर्चेनुसार मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामास **अंदाजित रु.२७.९९ कोटी इतक्या किंमतीच्या सुधारित अंदाजपत्रकास सहमती दर्शविली आहे.** त्यानुसार मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामाच्या द्वितीय सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दिनांक २९.११.२०२१ रोजी झालेल्या उच्चाधिकार सचिव समितीच्या बैठकीत मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामात

आर.सी.सी.संकल्पनेतील बदल, जोता पातळीत झालेली वाढ व मूळ किंमतीमध्ये वस्तु व सेवा कर यांचा अभाव, ठेव निधीमुळे सेंटेज चार्जेसमध्ये झालेली वाढ, क्षेत्रफळात झालेल्या वाढीमुळे विंधन विहीर अग्निशमनाकरीता लागणारी आवश्यकता इ.बाबींच्या वाढीव किंमतीमुळे **रु.२७.९९ कोटी इतक्या किंमतीच्या** अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत **उच्चाधिकार समितीने** दिलेल्या सहमतीस अनुसरुन खालील अटींच्या अधीन राहून शासनाची सुधारित प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे.:-

१. सदर बांधकामाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/ प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
५. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च  योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
६. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.
७. सदर काम रु.२७९९.५१ लक्ष इतक्या रकमेत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१३१०५६३९६८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2021.12.13 10:57:57 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर
४. उपवनसंरक्षक (प्रा.), नागपूर
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)